जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पांतर्गत(Maharashtra)Agriculture Competitive Project) कृषि सेवा घटकांच्या अंमलबजावणी करणेबाबत..

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय कृविका-१७१०/प्र.क्र.३४२/३ अे
मंत्रालय विस्तार, मुंबई-४००० ०३२
दिनांक- ६ जून,२०११

**वाचा-** १) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक कृवास-२००७/प्र.क्र.४०/११-स, दिनांक ३१ डिसेंबर,२००७

२) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक बासप्र-०६१०/प्र.क्र.१४१/२१-स, दिनांक ३० मार्च,२०११

३. ) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक बासप्र-२००८/प्र.क्र.४५/२१-स दिनांक ०९/०५/२०११.

**प्रस्तावना-**

राज्याच्या आर्थिक व्यवस्थेत शेतीला अन्यन्य साधारण महत्व आहे. राज्यात घेतल्या जाणा-या बहुतेक पिकांची उत्पादकता राष्ट्रीय सरासरीपेक्षा कमी आहे. शेतमालाच्या विक्री व्यवस्थेत त्रुटी असून त्यामुळे शेतक-यांच्या शेतमालाला योग्य बाजारभाव मिळत नाही. पणन व्यवस्थेतील प्रमुख त्रुटी पुढील प्रमाणे आहेत. विक्रेत्यांची प्रचंड लांब साखळी, बाजार व्यवस्था व बाजार भाव सेवांची कमतरता, प्रतवारी, साठवणूक, शीतगृहे, प्रक्रीयासाठी पायाभूत सुविधाचा अभाव, खाजगी क्षेत्रात पारदर्शकतेचा अभाव इ.

शेतीची उत्पादकता आणि पणनव्यवस्था या दोन्ही बाबतीत अडचणी आहेत. देशाच्या आणि राज्याच्या सकल घरेलू उत्पादनातील (GDP) विकासाच्या वाढीचा दर सतत वाढत आहे. विकासाच्या या वाढत्या आलेखामुळे शहरातील ग्राहकांचे उत्पन्नही वाढले असून शेतमालाची मागणीही वाढली आहे. तथापि ही मागणी उच्च मुल्यवर्धित व गुणवत्तापुर्ण शेतमालाची आहे. या बदललेल्या बाजाराची आव्हाने स्विकारण्यासाठी शेतकरी व बाजारव्यवस्था स्पर्धाक्षम करणे आवश्यक आहे. यासाठी कृषि विस्तार सेवा आणि बाजारव्यवस्थेत सुधारणा करणे या महत्वाच्या दोन बाबी विचारात घेऊन जागतिक बँकेच्या सहाय्याने महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प (Maharashtra Agriculture competitive project) राबविण्यात येत आहे. या प्रकल्पांतर्गत कृषि सेवा घटकाच्या अंमलबजावणीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

बदलत्या बाजाराच्या आवश्यकतेनुसार गुणवत्तापूर्ण आणि उच्च मुल्याधारीत शेतमालाची उत्पादकता वाढविण्यासाठी शेतक-यांना आणि बाजारव्यवस्थेला स्पर्धाक्षम करणे आवश्यक आहे. आणि

यासाठी राज्यात जागतिक बँकेच्या सहाय्याने महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प राबविण्यात येत आहे.या प्रकल्पांतर्गत कृषि संवा घटकांच्या अंमलबजावणीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**प्रकल्पाची उद्दीष्ट्ये**

उत्पादकता वाढ, निव्वळ उत्पन्न वाढ आणि शेतक-यांना कृषि पणन सुविधा पुरविणे हे प्रकल्पाचे मुख्य उदीष्ट आहे. याशिवाय खालीलप्रमाणे प्रकल्पाची उदीष्ट्ये आहेत.

१) कृषि विस्तार सेवांमध्ये आत्माच्या माध्यमातून सुधारणा करणे, प्रशिक्षण, क्षमतावृध्दी आणि शेतक-यांपर्यत तंत्रज्ञान पोहचविणे आणि बाजाराभीमुख कृषि विस्तारावर भर देणे.

२) उत्पादकता वाढ, उत्पादनांच्या गुणवत्तेत वाढ, वैविध्यपूर्ण व्यवसायातून शेतक-यांच्या उत्पन्नात वाढ, रोजगाराच्या संधीमध्ये वाढ आणि ग्रामीण जीवनात शेती आणि बिगरशेती क्षेत्रात उत्पादन साधनांमध्ये वाढ .

३) कृषि आणि पूरक क्षेत्रात खाजगी गुंतवणूकीत वाढ आणि कृषि विस्तारासाठी उपलब्ध शासकिय तरतुदींचा विस्तार आणि तंत्रज्ञान प्रसारासाठी कार्यक्षम वापर

४) बदलत्या शहरी जीवनशैलीसाठी आवश्यक गुणवत्तापूर्ण उच्च किंमतीच्या उत्पादनांचा पुरवठा करण्यासाठी शेतक-यांना स्पर्धाक्षम बनवून नविन बाजाराच्या संधी हस्तगत करणे आणि निव्वळ उत्पन्न वाढविणे.

५) उगवत्या बाजाराला गुणवत्तापूर्ण उच्च मानांकित उत्पादन करणारा आणि सकारात्मक प्रतिसाद देणारा शेतकरी उभा करून या संधीचा फायदा शेतक-यांना करून देणे.

६) शेतकरी आणि बाजार यांच्यातील दरी कमी करण्यासाठी शासन करित असलेल्या प्रयत्नांना मदत करणे आणि यातुन कार्यक्षम बाजार व्यवस्था निर्माण करणे.

७) वैविध्यपूर्ण बाजाराच्या संधी शेतक-यांना उपलब्ध करून देणे. शेतक-यांचे संघ स्थापन करून खाजगी क्षेत्राच्या सहकार्याने उत्पादनासाठी आणि काढणीत्तोर आवश्यक सोयी सुविधा शेतक-यांना उपलब्ध करून देणे.

व्यापारक्षम शेती आणि बाजार यात खाजगी क्षेत्राच्या गुंतवणुकीला प्रोत्साहन देणे.

या प्रकल्पांतर्गत शेतक-यांसाठी कृषि विस्तार सेवा आणि बाजारव्यवस्था यात सुधारणा करण्यावर भर देण्यात येणार आहे. हा प्रकल्प येत्या सहा वर्षात टप्याटप्याने संपुर्ण राज्यात राबवावयाचा आहे. जागतिक बँकेच्या आर्थिक सहाय्याने प्रकल्प अहवाल तयार करणे, अहवालाची छाननी करणे व अहवालास अंतिम मान्यता देणे या बाबींची नियंत्रण करण्यासाठी संदर्भाधिन क्र.१ अन्वये मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समिती स्थापित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदरहू प्रकल्पांची अंमलबजावणी सर्व जिल्ह्यांमध्ये टप्याटप्याने साधरणतः खालीलप्रमाणे १ ते दिड वर्षाच्या अंतराने क्रमाक्रमाने सुरु करण्यात येणार आहे.

| अ.क्र. | टप्पा- १ जिल्हे | टप्पा- १ जिल्हे | टप्पा- १ जिल्हे |
|---|---|---|---|
| १ | अमरावती | नागपूर | सिंधुदुर्ग |
| २ | अकोला | वर्धा | रत्नागिरी |
| ३ | वाशिम | भंडारा | रायगड |
| ४ | यवतमाळ | गोंदिया | ठाणे |
| ५ | बुलढाणा | चंद्रपूर | नाशिक |
| ६ | जालना | गडचिरोली | धुळे |
| ७ | औरंगाबाद | लातूर | जळगांव |
| ८ | परभणी | बीड | नंदुरबार |
| ९ | हिंगोली | उस्मानाबाद | पुणे |
| १० | अहमदनगर | सोलापूर | सातारा |
| ११ | | नांदेड | सांगली |
| १२ | | | कोल्हापूर |

२. प्रकल्प अंमलबजावणी अहवालानुसार प्रकल्पांतर्गत कृषि विभागाचा स्वतंत्र प्रकल्प अंमलबजावणी कक्ष (पी.आय.यु) राज्यस्तरावर स्थापित करण्यात आला आहे. त्याची संरचना खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | पदनाम | संख्या | नियुक्तीचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | नोडल ऑफिसर | १ | कृषि विभागातून प्रतिनियुक्ती |
| २ | कृषि अधिकारी | १ | कृषि विभागातून प्रतिनियुक्ती |
| ३ | सामुहिक विस्तार अधिकारी | १ | कृषि विभागातून प्रतिनियुक्ती |
| ४ | कृषि पणन विशेषज्ञ | १ | करार सेवेने |
| ५ | संपादन अधिकारी | १ | करार सेवेने |
| ६ | लेखापाल (संगणक ज्ञानासह) | १ | करार सेवेने |
| ७ | सहाय्यक (संगणक ज्ञानासह) | २ | करार सेवेने |
| ८ | संदेश वाहक | २ | करार सेवेने |

हा कक्ष या प्रकल्पासाठी पूर्णवेळ कार्यरत राहील. प्रकल्पांच्या सर्व घटकाच्या अंमलबजावणी विषयक बाबींचे संनियंत्रण, मुल्यमापन सर्व संबंधित विभागाशी समन्वय ठेवून प्रकल्प अंमलबजावणी अहवालानुसार जागतिक बँकेसमवेत सर्वंकष समन्वय ठेवण्याचे काम या कक्षामार्फत करण्यात येईल.

जिल्हा स्तरावर प्रकल्प संचालक, आत्मा तथा जिल्हा स्तरावर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे अधिनस्त या प्रकल्पासाठी पुढाल विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे कक्ष कार्यरत राहील

| अ.क्रं | पदनाम | संख्या | नियुक्तीचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | कृषि पणन तज्ञ | १ | करार सेवेने |
| २ | लेखापाल (संगणक ज्ञानासह) | १ | करार सेवेने |
| ३ | सहाय्यक (संगणक ज्ञानासह) | १ | करार सेवेने |

३. महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पांतर्गत, कृषि सेवा घटकांच्या अंमलबजावणी, संनियंत्रण, मुल्यमापन, सर्व प्रकारच्या कार्यक्रमांचे आयोजन, समित्यांचे कार्य विषयक विविध स्तरांवरील कामाचा योग्य समन्वय ठेवून त्यामध्ये सु-सूत्रता, सुलभता राहण्याकरीता प्रकल्प अंमलबजावणी अहवालानुसार सर्व स्तरावरुन करावयाच्या कामाकरीता आवश्यक असलेल्या सविस्तर मार्गदर्शक सूचना आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. यांनी तातडीने निर्गमित कराव्यात. या प्रकल्पांतर्गत आयुक्त (कृषि) यांचे मार्फत वितरीत केल्या जाणा-या भौतिक व आर्थिक लक्षांकानुसार कार्यक्रम राबवण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. या प्रकल्पांतर्गत करावयाची खरेदी आणि संपादीत करावयाच्या सेवा जागतिक बँकेच्या वित्तीय नियमावली नुसार कराव्यात. जागतिक बँकेने मंजूर केलेल्या संपादन नियोजनानुसार (Procurtment Plan) त्या त्या स्तरांवर खरेदीची/संपादनाची कार्यवाही करावी.

४. महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पांतर्गत, (Maharashtra Agriculture competitive project) कृषि सेवा अंमलबजावणीसाठी निधी खाली दर्शविलेल्या मुख्य लेखाशिर्षाखाली वितरीत करण्यात येईल.

**राज्य** २४३५- इतर कृषिविषयक कार्यक्रम.
०१- पणन व गुणवत्ता नियंत्रण.
१९९ - इतर अशासकिय संस्थाना सहाय्य
(०१) - बाह्य सहाय्यित प्रकल्प
(०१)(०१) - जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प (राज्य योजना) (राज्य हिस्सा) (२४३५-००१-७)
३२ - अंशदाने

**केंद्र** २४३५- इतर कृषिविषयक कार्यक्रम.
(०१) - पणन व गुणवत्ता नियंत्रण.
१९९ - इतर अशासकिय संस्थाना सहाय्य
(०१) - बाह्य सहाय्यित प्रकल्प
(०१)(०२) - जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प (राज्य योजना) (बाह्य हिस्सा) (२४३५-००२-६)
३२ - अंशदाने

या प्रकल्पासाठी आयुक्त, (कृषि), यांचेकडे प्रकल्प अंमलबजावणी कक्ष आणि जिल्हास्तरांवरील आत्मासाठी निधी वितरीत करण्यात येईल. फलोत्पादन प्रक्रीया प्रशिक्षण संस्था, औरंगाबाद साठीचा निधी

विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद यांचेकडे वितरीत होईल. या प्रकल्पासाठी विविध स्तरांवर खालील अधिका-यांना नियंत्रण अधिकारी आणि आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणेत येत आहे.

| अ.क्र | स्तर | आहंरण व संवितरण अधिकारी | नियंत्रण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्त (कृषि) | सहाय्यक संचालक लेखा-१ | आयुक्त (कृषि) |
| २ | फलोत्पादन प्रक्रिया प्रशिक्षण संस्था, औरंगाबाद | लेखाधिकारी, विभागीय कृषि सहसंचालक औरंगाबाद | विभागीय कृषि सहसंचालक औरंगाबाद |

५. सदरहू प्रकल्पाची प्रकल्प संरचना आणि कृषि विभागातंर्गत राबवावयाच्या बाबी ही परिशिष्ठ -१ मध्ये दर्शविल्यानुसार राहतील आणि निधी वितरण पध्दत परिशिष्ठ -२ मध्ये प्रमाणे राहतील.

६. हे आदेश प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा सांकेतांक क्र. २०११०६०६१४५४५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(वीणा राऊत)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन
कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्यव्यवसाय विभाग

प्रति,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,
प्रधान सचिव ( कृषि व पणन ), मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (नियोजन) नियोजन विभाग
प्रधान सचिव (वित्त) वित्त विभाग
प्रधान सचिव (सहकार व पणन) सहकार व पणन विभाग
आयुक्त, (कृषि) महाराष्ट्र राज्य,पुणे,
आयुक्त, (पशुसंवर्धन) महाराष्ट्र राज्य,पुणे,
संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, व्ही. आय. पी. रोड,धरमपूर, नागपूर.
संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय पुणे.(५ जादा प्रतींसह)
सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, पुणे.
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
सर्व जिल्ह्यांचे कोषागार अधिकारी

महालेखाकार (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपुर,
मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/विशेष कार्यकारी अधिकारी.
मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
सहसचिव (पदुम) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्यव्यवसाय विभाग
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मस्यव्यवसाय विभाग
सहकार व पणन विभाग,मंत्रालय,मुंबई- ३२
कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती.३-अे

## परिशिष्ट - १
## महाराष्ट्र स्पर्धक्षम कृषि विकास प्रकल्प

**प्रकल्पात समाविष्ट विभाग**

राज्य शासनाच्या कृषि पणन, कृषि आणि पशुसंवर्धन विभागामार्फत प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यात येईल.

**प्रकल्प समन्वय कक्ष (पी.सी.यु)**

प्रकल्पाच्या समन्वयासाठी जागतिक बँकेच्या मान्यतेने तयार करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी अहवालानुसार मान्य केल्यानुसार पुणे येथे प्रकल्प समन्वय कक्ष स्थापना करण्यात आले आहे.

**प्रकल्प अंमलबजावणी कक्ष (पी.आय.यु - कृषि)**

प्रकल्प अंमलबजावणी अहवालानुसार प्रकल्पांतर्गत समाविष्ट कृषि विभागाचा स्वतंत्र पी.आय.यु कक्ष राज्यस्तरांवर स्थापित करण्यात आला आहे त्याची संरचना खालील प्रमाणे.

| अ.क्रं | पदनाम | संख्या | नियुक्तीचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | नोडल ऑफीसर | १ | कृषि विभागातून प्रतिनियुक्ती |
| २ | कृषि अधिकारी | १ | कृषि विभागातून प्रतिनियुक्ती |
| ३ | सामुहीक विस्तार अधिकारी | १ | कृषि विभागातून प्रतिनियुक्ती |
| ४ | कृषि पणन विशेषज्ञ | १ | करार सेवेने |
| ५ | संपादन अधिकारी | १ | करार सेवेने |
| ६ | लेखापाल (संगणक ज्ञानासह) | १ | करार सेवेने |
| ७ | सहाय्यक (संगणक ज्ञानासह) | २ | करार सेवेने |
| ८ | संदेश वाहक | २ | करार सेवेने |

**प्रकल्प संरचना**

प्रकल्प उदिष्ट पूर्तीसाठी खालील बाबींचा महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पात समावेश करण्यात आला आहे.

### अ) सघन आणि वैविध्यपूर्ण बाजारभिमूख उत्पादन

१. बाजाराभिमूख तंत्रज्ञानाचा प्रसार (अ.१)
२. व्यापारक्षम शेती प्रोत्साहन सुविधा (अ.२)
३. बाजार माहिती सेवा (अ.३)
४. पशुसंवर्धन सेवांसाठी मदत (अ.४)

### ब) शेतक-यांसाठी बाजार सुविधा व सुधारणा

### ब - १ पर्यायी बाजारांना प्रोत्साहन

१. शेतकरी संघामार्फत , गटामार्फत शेतमालाचे एकत्रीकरण आणि विक्री (ब.१)
२. धान्य तारण योजना (ब.२)
३. ग्रामीण आठवडी बाजार (ब.३)
४.इलेक्ट्रोनिक बाजारांची सुरूवात (ब.४)

**ब - २ पारंपारीक बाजारांचे आधुनिकीकरण**

१. घाऊक बाजारांचे आधुनिकीकरण (ब.२)
२. जनावरांच्या बाजारांमध्ये सुधारणा (ब.२.२)

**कृषि विभागामार्फत राबवावयाच्या बाबी**

उपरोक्त संरचनेतील मुख्यतः अ घटकाची अंमलबजावणी कृषि विभागाकडून होईल. तथापि प्रकल्प एकात्मिक पध्दतीने राबवावयाचा आहे म्हणजे प्रकल्पाच्या ब घटका खाली विकसीत होणा-या बाजाराच्या कार्यक्षेत्रातच अ घटकाची अंमलबजावणी करावयाची आहे.

**१) आत्मा बळकटीकरण**

या बाबीखाली खालीलप्रमाणे बाब निहाय तरतूद करण्यात आलेली आहे.

**१.१ आत्माबळकटीकरणांसाठी करार पध्दतीने नेमावयाचे कर्मचारी**

प्रकल्पांतर्गत ३३ जिल्ह्यामध्ये आत्मा स्तरांवर खालीलप्रमाणे तज्ञ आणि कर्मचा-यांची करार पध्दतीने नियुक्ती करावयाची आहे.

| अ.क्रं | पदनाम | संख्या | नियुक्तीचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | कृषि पणन तज्ञ | १ | करार सेवेने |
| २ | लेखापाल (संगणक ज्ञानासह) | १ | करार सेवेने |
| ३ | सहाय्यक (संगणक ज्ञानासह) | १ | करार सेवेने |

**१.२ यंत्रसामुग्री आणि माहीती तंत्रज्ञान सहाय्य**

प्रति जिल्हा रू २.५०/- लाख या तरतुदीतून आत्मा स्तरांवर संगणक, प्रिंटर खरेदी इ आणि C.D, Video तयार करणेसाठी सदरची तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूद प्रकल्प कालावधीत एकदाच असेल. साहीत्याची खरेदी केंद्र शासनाच्या DGS&D दर करारानुसार( राज्य शासनाच्या दर करारानुसार नव्हे) किंवा दरपत्रके मागवून जागतिक बँकेच्या संपादन पुस्तिके मधील विहीत (Procurement Manual) पध्दतीचा अवलंब करून खरेदी करावी. यासाठी प्रकल्प संचालक आत्मा तथा जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना प्राधिकृत करण्यांस शासन मान्यता देण्यांत येत आहे.

**१.३ शेतकरी सल्ला व माहीती केंद्र (FIAC)**

प्रत्येक जिल्हयातून दोन (FIAC) च्या बळकटीकरणासाठी रूपये २.०० लाख प्रति FIAC ची तरतूद करण्यात आलेली आहे. या तरतूदीतून संगणक साहीत्य आणि फर्निचर खरेदी करावयाचे आहे. साहीत्याची खरेदी केंद्र शासनाच्या DGS&D दर करारानुसार (राज्य शासनाच्या दर करारानुसार नव्हे) किंवा दरपत्रके मागवून जागतिक बँकेच्या संपादन पुस्तिके मधील विहीत (Procurement Manual) पध्दतीचा अवलंब करून खरेदी करावी यासाठी प्रकल्प संचालक आत्मा तथा जिल्हा अधिक्षक कृषि

अधिकारी यांना प्राधिकृत करण्यांस शासन मान्यता देण्यांत येत आहे.

**१.४ जिल्हास्तरीय अधिका-यांची जागृती कार्यशाळा**

जिल्हास्तरीय कृषि आणि संलग्न विभागाच्या अधिका-यांना महाराष्ट्र कृषि स्पर्धाक्षम प्रकल्पाबाबत माहीती देणे, प्रकल्पाविषयी जागृती निर्माण करणे यासाठी प्रकल्प कालावधीत प्रत्येक जिल्हयात दोन कार्यशाळा आयोजित करण्यासाठी प्रति कार्यशाळा रूपये ०.६० लाख प्रमाणे तरतूद करण्यात आलेली आहे.

**१.५ शेतकरी गटांची स्थापना**

सदर प्रकल्पांतर्गत राज्यात एकुण ६७०० (प्रति जिल्हा साधारणपणे २०० ते २५०) शेतकरी गटांची स्थापना करावयाची आहे. यातील ६००० गट पीक आधारीत असतील आणि ७०० गट पशुसंवर्धनाशी संबंधित असतील.

**१.६ शेतकरी गटांच्या स्थापनेसाठी स्वयंसेवी संस्थेची निवड**

प्रकल्पांत शेतकरी गटांची स्थापना आणि गटांना प्रशिक्षित करून गट कार्यान्वित करण्याची जबाबदारी सेवा पुरवठादार स्वयंसेवी संस्थेला देण्यात येणार आहे. या कामांसाठी संस्थेची निवड प्रकल्प अंमलबजावणी कक्षामार्फत राज्य स्तरांवरून करण्यात येईल. या प्रकल्पांतर्गत बाजाराभिमुख विस्तार केंद्रस्थानी ठेवून गटांची स्थापना करावयाची आहे. गटांची स्थापना आणि त्यांना कार्यान्वीत करावयाची जबाबदारी निवडलेल्या स्वयंसेवी सेवा संस्थेची असली तरी त्यांचे सनियंत्रण पूर्णतः आत्मामार्फत करण्यात यावे. गटांची निवड सहकार व पणन विभागामार्फत बाजार सुविधांसाठी प्रकल्पाच्या ब घटकांतर्गत सहाय्य करण्यांत आलेल्या कृषि उत्पन्न बाजार समित्या, आठवडी बाजार, शेतकरी सामुहीक सुविधा केंद्र यांचे कार्यक्षेत्रातून करण्यात यावी.

**२) कृषि पणन आराखडा तयार करणे (Marketing Strategy Supplement) M.S.S.**

कृषि विस्तार सेवांमध्ये धोरणात्मक सुधारणा करून जिल्हास्तरांवर आत्मा संस्थेची स्थापना करण्यात आली आहे. आत्माच्या पध्दतीने कृषि विस्ताराचा पाया एस.आर.ई.पी आराखड्यांनी घालण्यात आला आहे. एस.आर.ई.पी. तयार करताना बाजाराभिमुख कृषि विस्ताराबाबत फारसा विचार झालेला नाही. ही बाब लक्षात घेऊन या प्रकल्पांतर्गत घटकांच्या अंमलबजावणीसाठी एस.आर.ई.पी ला पूरक सहपत्र कृषि पणन आराखडा (Marketing strategy suppliment) तयार करावयाचा आहे. यासाठी प्रति जिल्ह रूपये २.०० लाख इतकी तरतूद करण्यात आली आहे. M.S.S. तयार करण्यासाठी एस.आर.ई.पी ची कार्यपध्दती अवलबंवयाची आहे. M.S.S. करण्याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना तयार करणे, पी.आय.यु. आणि आत्मातंर्गत नियुक्त कृषि पणन तज्ञ यांना प्रक्षिशित करण्याचे काम वनामती नागपूर यांचेमार्फत करण्यात येईल.

**२.१ प्रशिक्षण**

**२.१.१ कृषि व संलग्न विभाग - अधिका-यांचे प्रशिक्षण**

प्रकल्प कालावधीत राज्यात एकुण २४ प्रशिक्षण सत्रांचे आयोजन करण्यात येईल. प्रत्येक सत्रास ३० अधिकारी असतील. एका सत्रासाठी रूपये १.५० लाख एवढी तरतुद ठेवण्यात आलेली आहे. सदर प्रशिक्षणांचे आयोजन वनामती नागपूर यांचेमार्फत अंमलबजावणी कक्ष- (कृषि) यांच्या समन्वयाने

करण्यात येईल. तसेच काही अधिका-यांसाठी परदेशातील प्रशिक्षणाचे आयोजन प्रकल्प अंमलबजावणी कक्ष (कृषि) यांचे मार्फत करणेत येईल.

**२.१.२ प्रशिक्षणांसाठी अधिका-यांची निवड -**

सदर प्रकल्पांच्या ब घटकांतर्गत जिल्हा उपनिबंधक सहकार यांचेमार्फत मुख्यतः तीन घटकांची अंमलबजावणी करण्यात येणार आहे ते घटक पुढील प्रमाणे निवडक

१) कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या सुविधांमध्ये सुधारणा, ( APMC)
२) शेतकरी सामुहीक सेवा केंद्र ( FCSC )
३) ग्रामीण आठवडी बाजारामध्ये सुधारणा ( RH )

उपरोक्त घटक जिल्हयातील ज्या कार्यक्षेत्रात राबविण्यात येणार आहेत त्याच कार्य क्षेत्रातील कृषि व संलग्न विभागातील अधिका-यांची प्रशिक्षणांसाठी निवड आत्मा स्तरांवर सहकार व पणन व पशूसंवर्धन विभागाशी योग्य तो समन्वय राखुन अधिका-यांची निवड आत्मा मार्फत करावी.

**२.१.३ क्षेत्रीय विस्तार कर्मचा-याचे प्रशिक्षण**

घटकाचे नियोजन प्रकल्प अंमलबजावणी कक्ष (कृषि) आणि रामेती अथवा कृषि विज्ञान केंद्र यांच्या मार्फत करण्यात येईल. प्रकल्प कालावधीत राज्यात एकुण ४८ प्रशिक्षण सत्रांचे आयोजन करण्यात येईल. प्रत्येक सत्रास ३० कर्मचा-यांचा समावेश असेल आणि प्रति सत्रासाठी रूपये ०.९० लाख एवढी तरतूद ठेवण्यात आली आहे.

**२.१.४ शेतकरी प्रशिक्षण**

**अ) कृषि पणन व्यवस्था सुधारणांसाठी शेतकरी प्रशिक्षण**

ब घटकाखाली ज्या कृषि उत्पन्न बाजार समित्या, आठवडी बाजार, शेतकरी संघ, जनावरांचे बाजार यांना मदत करण्यात येईल. अशा बाजारांच्या कार्यक्षेत्रातून शेतक-यांना कृषि पणन व्यवस्था सुधारणांसाठी आत्मामार्फत प्रशिक्षण द्यावयाचे आहे.

**ब) कृषि उत्पन्न बाजार समिती APMC (प्रशिक्षण प्रकल्पातंर्गत विकसीत बाजारांच्या कार्यक्षेत्रातील शेतक-यांसाठी)**

सदर प्रशिक्षण कृषि उत्पन्न बाजार समितीच्या सभागृहात आयोजित करावे. एका प्रशिक्षण सत्रासाठी २५ शेतक-यांची निवड करावयाची असून त्यासाठी रू. १३०००/- इतका खर्च अपेक्षित आहे. या प्रशिक्षणांच्या आयोजनांसाठी समन्वयक म्हणून आत्मा अंतर्गत असणारे कृषि पणन तज्ञ काम पहातील. प्रशिक्षणाचे आयोजनांसाठी सहकार व पणन विभाग, कृषि उत्पन्न बाजार समित्या यांचा सक्रीय सहभाग राहील किंबहुना प्रशिक्षणांचे आयोजन पणन विभागाने आत्माच्या मदतीने करावयांचे आहे.

**क) ग्रामीण आठवडी बाजार RHs. (प्रशिक्षण प्रकल्पातंर्गत विकसीत बाजारांच्या कार्यक्षेत्रातील शेतक-यांसाठी)**

प्रकल्पांतर्गत राज्यातील ३०० आठवडी बाजारांची निवड करून तेथील सोयीसुविधा सुधारणासाठी ग्रामपंचायतींना प्रकल्प खर्चाच्या ९०% अधिकतम रूपये १८.०० लाख इतके अनुदान देण्यात येणार आहे. या घटकांसाठी निवडलेल्या आठवडीबाजाराच्या ग्रामपंचायतीमध्ये कृषि उत्पन्न बाजार समिती प्रशिक्षणात नमुद तपशीलाप्रमाणे शेतकरी प्रशिक्षण आयोजित करावे.

**ड) शेतकरी सामुहिक सुविधा केंद्र, FCSC. (प्रशिक्षण प्रकल्पातंर्गत विकसीत बाजारांच्या कार्यक्षेत्रातील शेतक-यांसाठी)**

या प्रमुख बार्बीखाली शेतकरी सामुहीक सुविधा केंद्रांची स्थापना करण्यात येणार आहे. या सामुहीक सुविधा केंद्राचा मुख्य उद्देश शेतमालाचे एकत्रीकरण करून विक्री व्यवस्था निर्माण करणे हा आहे. या केंद्रांचे संचलन २५० ते ३०० शेतकरी सभासद असलेल्या शेतकरी संघामार्फत होईल. या संघाची नोंदणी सहकार कायद्याखाली अथवा कंपनी कायद्यामध्ये करण्यात येईल. राज्यात अशा प्रकारचे एकुण ४०० सामुहिक सुविधा केंद्रे स्थापन करण्यात येतील. ज्यात २०० केंद्रे फळे व भाजीपाला यांच्या एकत्रीकरण आणि हाताळणीसाठी असतील आणि २०० केंद्रे धान्य पिकांसाठी असतील. या सामुहीक सुविधा केंद्रांचे सदस्य असलेल्या शेतक-यांना प्रशिक्षण देण्यासाठी २००० प्रशिक्षण सत्रांचे आयोजन करण्यात येईल. २५ शेतक-यांच्या एका बॅचसाठी रू. १३०००/- प्रति सत्र तरतूद करून प्रशिक्षणाचे आयोजन करण्यात यावे.

**ई) पशुसंवर्धन विभागाशी निगडीत (प्रशिक्षण प्रकल्पातंर्गत विकसीत बाजारांच्या कार्यक्षेत्रातील शेतक-यांसाठी)**

प्रकल्पामधून १००% अनुदानावर बाजारांच्या आधुनिकी करणासाठी सहाय्य करण्यात येणार आहे. यासाठी निवडण्यात आलेल्या बाजारांच्या कार्यक्षेत्रात शेतक-यांना आत्मामार्फत मार्गदर्शक सुचनानुसार आत्माकडून प्राप्त तरतूदीतून जिल्हास्तरीय पशूसंवर्धन उपायुक्त आणि जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी यांनी प्रशिक्षण आयोजित करावे.

**२.२ विशिष्ट कृषि सेवा देणारे मनुष्यबळ विकसीत करण्यासाठी (प्रशिक्षण प्रकल्पातंर्गत विकसीत बाजारांच्या कार्यक्षेत्रातील शेतक-यांसाठी)**

पिकांच्या काढणोत्तर व्यवस्थापनांकडे शेतक-यांचा कल वाढत आहे. काढणोत्तर व्यवस्थापनामुळे उत्पादीत मालाचे मूल्यवर्धन होऊन अधिक किंमत मिळू शकते ही बाब शेतक-यांच्या लक्षात आली आहे. या क्षेत्रातील व्यापाराच्या संधी लक्षात घेता ग्रामीण महिला , युवक, बचत गट, शेतकरी गट यांची भूमिका महत्वपूर्ण ठरू शकते. तथापी समाजातील या घटकांचा योग्य उपयोग होण्यासाठी त्यांना काढणोत्तर तंत्रज्ञान आणि मूल्यवर्धन या बाबींचे प्रशिक्षण देणे आवश्यक आहे. या प्रशिक्षणात विशिष्ट कौशल्य वृध्दी वर भर देऊन प्रशिक्षित मनुष्यबळ हे म्हणून पुढे आले पाहीजे असे प्रशिक्षण मनुष्यबळ शेतक-यांच्या गटांना प्रशिक्षण देणारे तज्ञ म्हणून काम करणे अपेक्षित आहे. हे प्रशिक्षण कौशल्यवृध्दीचे असल्याने या प्रशिक्षणांसाठी वेगवेगळे प्रशिक्षण मोड्युल तयार करणे आवश्यक आहे. तसेच असे प्रशिक्षण देणा-या संस्था शोधणे आवश्यक आहे. अशा प्रशिक्षणांच्या गरजांचे विश्लेषण करून प्रशिक्षण मोड्युल विकसीत करण्यासाठी या प्रकल्पांतर्गत राज्यस्तरांवर सेवा संस्थेची नियुक्ती करण्यात येणार आहे. या सेवा संस्थेकडून मोड्युलनुसार राज्यातील १०,००० प्रशिक्षणार्थीना प्रशिक्षण द्यावयाचे आहे. या प्रशिक्षणांसाठी प्रति २० प्रशिक्षणार्थीच्या बॅचसाठी रू. ५०,०००/- इतकी तरतूद करण्यात आली आहे. सेवा संस्थेमार्फत विकसित विविध मोड्युलसाठी प्रशिक्षणार्थीची निवड करून प्रशिक्षणार्थीना प्रशिक्षण संस्थेत पाठविण्याचे मुख्य काम आत्मा मार्फत करावयाचे आहे.

## २.३ शेतकरी अभ्यास दौरे

एम.ए.सी.पी अंतर्गत कृषि विभागामार्फत सर्व घटकांची अंमलबजावणी या प्रकल्पांतर्गत ज्या कृषी उत्पन्न बाजार समित्या, ग्रामीण आठवडी बाजार, शेतकरी सामुहीक सेवा केंद्रांना सहाय्य करण्यात आले आहे. अशा संस्थांच्या कार्यक्षेत्रातच कृषि विस्ताराच्या बाबी राबवावयाच्या आहेत. ही बाब अभ्यास दौ-यांनाही लागू होते. कृषि विकासासाठी अध्यास दौ-यांना अनन्य साधारण महत्व आहे. एखादी यशोगाथा प्रत्यक्ष डोळ्याने पाहील्यानंतर शेतक-यांचा त्यावर विश्वास बसतो आणि अशा यशोगाथांची पुनरावृत्ती होऊ शकते. ही बाब लक्षात घेऊन प्रकल्पात अभ्यास दौ-यांचा समावेश करण्यात आला.

### २.३.१ राज्याबाहेरील शेतकरी दौरे

यासाठी ३० शेतक-यांच्या एका बॅचसाठी रू. १.८० लाख इतकी कमाल तरतूद असेल. याचे आयोजन कृषि विभाग करेल. या अभ्यास दौ-यामध्ये शेतक-यांना विविध पिक ंचे संशोधन केंद्र ( आय.सीए.आर. ), कृषि विद्यापिठे, कृषि प्रक्रिया उद्योग, शेतक-यांच्या विविध यशोगाथा इ. तसेच आधुनिक पणन व्यवस्थापन असलेल्या राज्याबाहेरील बाजार भेटी आयोजित कराव्यात.

### २.३.२ राज्यांतर्गत शेतकरी दौरे

कृषि विभागाचे दौरे (पिकांवर आधारीत) उपरोक्त दौ-यांसाठी ३० शेतक-याच्या बॅचसाठी रू. ४५ हजार इतकी तरतूद आहे. दौ-यांचे आयोजन कृषि विभाग करेल. या दौ-यांचे आयोजन करताना वर नमूद राज्याबाहेरील दौ-यासाठी दिलेल्या सूचनांचे राज्यांतर्गत यशोगाथा, आदर्श व्यवस्थापन व बाजार फी या बाबींवर भर देण्यात यावा.

## २.४ प्रात्यक्षिके

**२.४.१ पिक प्रात्यक्षिके** कृषि विकासामध्ये तंत्रज्ञान प्रसारासाठी आणितंत्रज्ञानाचे अवलंबन वाढविण्यासाठी पिक प्रात्यक्षिक अत्यंत महत्वाचे आहेत. आत्मा अंतर्गत एस.आर.ई.पी तयार करताना प्रत्येक पिकांचे जिल्हयातील विविध हवामान परिस्थितीनुसार पाडलेल्या विभागांमध्ये तंत्रज्ञान अवलंबून उणीवा कोठे आहेत. तंत्रज्ञान वापरातील उणीवांचे विश्लेषण एस.आर.ई.पी मध्ये आहे. एस.आर.ई.पी वर आधारीत MSS तयार करून बाजारभिंमुख कृषि विस्तार, बदलत्या परीस्थितीत सहरी ग्राहकांची मागणी या गोष्टींचा विचार करून गुणवत्तापूर्ण शेतीमालाच्या उत्पादनातून शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढविण्यांचे दृष्टीने प्रात्यक्षिकांचे आयोजन करावे.

| अ. क्र | पिक प्रात्यक्षिके | प्रात्यक्षिकांचे क्षेत्र | रुपये खर्च प्रति प्रात्यक्षिके | शेती दिनासाठी रुपये खर्च प्रति प्रात्याक्षिके | एकूण रुपये खर्च प्रति प्रात्यक्षिके |
|---|---|---|---|---|---|
| १ | तृणधान्य | ०.४० | ४५००/- | १५००/- | ६०००/- |
| २ | कडधान्य | ०.४० | ५५००/- | १५००/- | ७०००/- |
| ३ | गळीतधान्य | ०.४० | ६५००/- | १५००/- | ८०००/- |
| ४ | फळ पिके | ०.२० | ५५००/- | १५००/- | ७०००/- |
| ५ | भाजीपाला पिके | ०.२० | ५५००/- | १५००/- | ७०००/- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६ | पुष्पोत्पादक | ०.१० | ५५००/- | १५००/- | ७०००/- |

**२.४.२ सेंद्रीय शेती प्रात्याक्षिके**

सेंद्रीय शेतीची मुख्य उदिष्टे पुढील प्रमाणे आहेत.

१) पिक उत्पादन खर्च कमी करणे.

२) सेंद्रीय शेतमालाला अधिक किंमत मिळवून देऊन उत्पन्नांत वाढ करणे.

| अ. क्र | पिक प्रात्यक्षिके | प्रात्यक्षिकांचे क्षेत्र | रुपये खर्च प्रति प्रात्यक्षिके | शेती दिनासाठी रुपये खर्च प्रति प्रात्याक्षिके | एकूण रुपये खर्च प्रात्यक्षिके |
|---|---|---|---|---|---|
| १ | तृणधान्य | ०.४० | ४०००/- | १५००/- | ५५००/- |
| २ | कापूस | ०.४० | ६५००/- | १५००/- | ८०००/- |
| ३ | कडधान्य | ०.४० | ४०००/- | १५००/- | ५५००/- |
| ४ | फळ पिके | ०.२० | ४०००/- | १५००/- | ५५००/- |
| ५ | भाजीपाला पिके | ०.२० | ४०००/- | १५००/- | ५५००/- |

**२.४.३ काढणी पश्चात तंत्रज्ञान व्यवस्थापन प्रात्याक्षिके**

शेत मालाला वाढीव दर मिळण्यासाठी शेतमालाची योग्य प्रतवारी करुन त्याचे योग्य पॅकेजींग करणे आणि लेबलींग करणे आवश्यक आहे. या बाबतचे तंत्रज्ञान सर्व सामान्य शेतक-यां पर्यंत पोहोचणे आवश्यक आहे. ही बाब लक्षांत घेऊन प्रकल्पांत काढणोत्तर तंत्रज्ञान व्यवस्थापनाच्या पध्दतीची प्रात्याक्षिके (Method Demonstrations) आयोजीत करावयाची आहेत. या प्रात्याक्षिकांसाठी एकूण रुपये ३५००/- प्रति प्रात्याक्षिक तरतूद असून त्यापैकी रुपये २०००/- धान्याची स्वच्छता करणे, प्रतवारी करणे, पॅकेजींग करणे यासाठी असून रुपये १५००/- शेती दिनाच्या आयोजनासाठी आहेत. शेती दिनासाठी उपलब्ध तरतूदीतून ५० शेतक-यांना अल्पोपहार देणे तांत्रिक माहीती पत्रिका पुरविणे आणि अनुषंगीक बाबीवर खर्च करणे अपेक्षित आहे. या प्रात्यक्षिकांच्या आयोजनासाठी कृषि विद्यापिठाशी संपर्क साधून उपलब्ध तंत्रज्ञान त्या बाबतची प्रात्याक्षिके (Method Demonstrations) आयोजीत करावयाची पध्दत याची रुपरेषा ठरवावी. आणि त्या प्रमाणे प्रात्याक्षिकांचे आयोजन करावे.

**२.५ शेतकरी / उत्पादक संघाचे बळकटीकरण**

संघ शेतकरी आणि शासन यांच्यात दुवा म्हणून चांगले काम करु शकतात. संघामार्फत आयोजीत कार्यशाळा, प्रशिक्षण इ. उपक्रमांना मदत करण्यासाठी प्रत्येक पिकांच्या संघासाठी रुपये दोन लाख प्रमाणे एकूण रुपये तीस लाख इतकी तरतूद राज्य स्तरांवर ठेवण्यात येईल.

**२.६ नाविण्यपुर्ण प्रयोग प्रकल्प**

क्षेत्रीय स्तरांवर अनेक नाविण्यपुर्ण प्रयोग केले जातात. हे प्रयोग पिकांच्या नविन जाती, शेती औजारे, व्यवस्थापन पध्दती बाबत असतात. त्या बाबत आत्माच्या नियमात्मक मंडळातून निर्णय घेणे आवश्यक आहे. अशा प्रयोगांना मदत करण्यासाठी राज्य स्तरांवर एकूण रुपये १.१४ कोटी इतकी तरतूद ठेवण्यांत आली आहे.

## २.७ डॉक्यूमेंटेशन सी.डी,व्हीडीओ

प्रकल्पाबाबतचे डाक्यूमेंटेशन तसेच यशोगाथांच्या आणि तंत्रज्ञान विषयक सी.डी, व्हीडीओ प्रकाशनासाठी प्रकल्पात तरतुद आहे.

## २.८ संनियत्रण व मुल्यमापन

१) या प्रकल्पाच्या संनियत्रण मुल्यमापनासाठी स्वतंत्र ऑनलाईन वेब बेस प्रणाली विकसीत करण्यात येईल. या प्रणालीसाठी आवश्यक माहीती वेळोवेळी क्षेत्रीय आणि जिल्हास्तरावर नियमीतपणे भरणे आवश्यक आहे. या मुल्यमापनाच्या आधारावरच प्रकल्पासाठी निधी उपलब्ध होणार आहे.

२) याशिवाय या प्रकल्पाच्या संनियत्रण व मुल्यमापनासाठी राज्यस्तरावरुन त्रयस्थ संस्थेची नेमणूक करण्यात येणार आहे. या संस्थेला आवश्यक ती माहीती पुरविण्याची जबाबदारी विभागातील संबधीत अधिका-यांची राहील.

३) अंतर्गत संनियत्रणासाठी विविध स्तरावरील अधिका-यांना क्षेत्रीय तपासणीचे लक्षांक खालील प्रमाणे राहील.

| अ.क्र | अधिकारी | तपासणी |
|---|---|---|
| १ | विभागी कृषि सहसंचालक | अधिनस्त प्रत्येक जिल्ह्यात वर्षातून किमान दोन वेळा क्षेत्रीय तपासणी |
| २ | समन्वयक(कृषि आणि पशुसंवर्धन) पी.सी.यु आणि नोडल अधिकारी (पी.आय.यु-कृषि) | राज्यातील सर्व जिल्ह्यात आवश्यकतेनुसार |
| ३ | जिल्हा अधिक्षक कृषि आधिकारी | १% |
| ४ | उप विभागीय कृषि आधिकारी | २% |
| ५ | तालुका कृषि आधिकारी | ५% |
| ६ | कृषि आधिकारी/ कृषि पर्यवेक्षक | ५०% |

उपरोक्त प्रमाणे तपासणी करुन संबधीत अधिका-यांनी त्याच्या नजीकच्या वरीष्ठ अधिका-यांना अहवाल द्यावा. विभागीय कृषि सहसंचालक यांनी केवळ त्याचा आणि अधिनस्त जिल्हा अधिक्षक कृषि आधिकारी यांचा संकलीत अहवाल संचालक विस्तार व प्रशिक्षण यांचे अधिनस्त नोडल अधिकारी, पी.आय.यु (कृषि) यांच्याकडे दर तीन महिन्यानी अनुक्रमे एप्रिल,जुन,सप्टे,डिंसे या महीन्यामध्ये खालील पप्रत्रात सादर करावा.

महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प तपासणी अहवाल

अधिका-यांचे नाव- पद-

तपासणी कालावधी- अहवाल सादर दिनांक-

| अ.क्र | प्रकल्पांतर्गत वार्षिक आर्थिक लक्षांक वर्ष | तपासणीची रक्कम | तपासणीची टक्केवारी (%) | तपासणी केलेल्या बाबी | | तपासणीत आढळलेल्या त्रुटी | केलेली कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | | | भौतिक | आर्थिक | | |
| २ | | | | | | | |

तपासणी अधिका-यांची स्वाक्षरी-

नाव-

पदनाम-

## परिशिष्ट - २
## महाराष्ट्र स्पर्धक्षम कृषि विकास प्रकल्प

**निधी वितरण पध्दत**

या प्रकल्पासाठी सहकार व पणन विभाग नोडल विभाग आहे. प्रकल्पासाठी एकत्रीत वित्तीय मागणी नूसार निधी नोडल विभागाकडे प्राप्त होईल आणि तो आवश्यकते नूसार कृषि विभागास प्राप्त होईल. शासन स्तरावरून कृषि विभागाकडून अंदाजपत्रकीय निधी वितरण प्रणालीद्वारे (BDS) निधी आयुक्त कृषि यांना वितरीत होईल. आयुक्त कृषि यांचेकडे प्राप्त निधी खालील चार स्तरासाठी खर्चाची पध्दत पुढील प्रमाणे असेल.

१) पी. आय.यु (कृषि)- या स्तरासाठीची तरतुद आयुक्त कृषि यांचे स्तरावरुन आवश्यकतेनुसार वेळोवेळी देयके कोषागारात सादर करुन खर्च करणेत येईल.

२) आत्मा स्तर- आत्मासाठीची संपुर्ण तरतुद आयुक्त स्तरावर कोषागारात देयक सादर करुन काढावी आणि कोअर बँकींग सुविधेचा वापर करुन निधी संबधीत जिल्ह्यांच्या प्रकल्पासाठीच्या स्वतंत्र खात्यात वर्ग करावा अशा रितीने प्राप्त निधी प्रकल्प संचालक आत्मा यांनी आवश्यकतेनुसार खर्च करावा. आवश्यक तेथे संलग्न विभागांना ही निधी प्रकल्प संचालक आत्मा यांनी धनादेशाचा स्वरुपात द्यावी व वेळोवेळी त्याचा अहवाल घ्यावा आणि खर्चाचा एकत्रित अहवाल प्रकल्प अंमलबजावणी कक्ष -कृषि (पी.आय.यु - कृषि) यांना द्यावा.

३) वनामती नागपूर स्तर वनामतीसाठी प्राप्त निधी आयुक्त कृषि स्तरावरच कोषागारातुन आंहरीत करावी. त्यासाठी आयुक्त कृषि स्तरावर कोषागारात देयक सादर करुन प्राप्त निधी संचालक वनामती यांना धनादेश /कोअर बँकींग द्वारे वितरीत करावी.

४) फळ प्रक्रिया प्रशिक्षण संस्था औरंगाबाद यांचेसाठी प्राप्त तरतुद मान्य विभागीय कृषि सहसंचालक औरंगाबाद यांना अंदाजप्रकीय वितरण प्रणाली (BDS) द्वारे आयुक्तस्तरावरुन वितरीत करावी. या संस्थेसाठीची देयके विभागीय कृषि सहसंचालक औरंगाबाद यांनी कोषागारात सादर करुन वेळोवेळी आवश्यकतेनुसार आहेरीत व वितरीत करावी.

अशा रीतीने कृषि विभागांतर्गत जिथे कोषागारात देयके सादर करावयाची आहे अशा विविध स्तरावर खालील प्रमाणे आहंरण, संवितरण आणि नियंत्रण अधिकारी असतील.

| अ.क्र | स्तर | आहंरण व संवितरण अधिकारी | नियंत्रण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्त कृषि | सहाय्यक संचालक लेखा-१ | आयुक्त कृषि |
| २ | फलोत्पादन प्रक्रिया प्रशिक्षण संस्था, औरंगाबाद | लेखाधिकारी, विभागीय कृषि सहसंचालक औरंगाबाद | विभागीय कृषि सहसंचालक औरंगाबाद |

५) या प्रकल्पांतर्गत करावयाची खरेदी आणि संपादीत करावयाच्या सेवा जागतिक बँकेच्या वित्तीय नियमावली नुसार कराव्यात. जागतिक बँकेने मंजूर केलेल्या संपादन नियोजनानुसार (Procurtment Plan) त्या त्या स्तरांवर खरेदीची/संपादनाची कार्यवाही करावी.

सन २०११-२०१२ करीता महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पांतर्गत कृषि सेवा अंमलबजावणीसाठीनिधी खालील मुख्य लेखाशिर्ष खाली वितरीत करणेत येईल.